महाराष्ट्र शिक्षण सेवा गट- अ (व) (तां)
संवर्गातील श्री. सतिश रुपचंद सुर्यवंशी यांचा
परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन आदेश क्रमांक : परिवि २०२१/प्र.क्र.१२५/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुख्य इमारत,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ११ ऑक्टोबर, २०२१

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र: परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९.०२.२०१६
२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई यांचे पत्र क्र.३/आस्था-१/ परिविक्षाधीन/२०२१, दि.११ मे, २०२१.

**प्रस्तावना:-**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (व) (तां) या संवर्गातील श्री. सतिश रुपचंद सूर्यवंशी यांचा दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीकरिता कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या व्यशिअ-२०११/(२८९/११)/व्यशि-१, दि.१६.०८.२०१३ रोजीच्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या शासन आदेशान्वये प्रथम नियुक्ती करण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (तां) या संवर्गातील श्री. सतिश रुपचंद सूर्यवंशी, सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (व) (तां) या संवर्गातील श्री. सतिश रुपचंद सूर्यवंशी यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केल्या असल्याने त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक पाच येथे नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्रमांक सहामध्ये नमूद करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नाव व पदनाम | रुजू दिनांक | परिवीक्षाधीन कालावधी पुढे ढकलण्याची कारणे | परिवीक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री सतिश रुपचंद सुर्यवंशी, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण | ३०.०४.२०१४ | ७ दिवस रजा | ०६.०५.२०१६ | ०७.०५.२०१६ |

२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही करावी.

**३.** सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९ फेब्रुवारी,२०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/ प्र.क्र.२०३/आठ, दि.२५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०१२१५३३५८९३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. NAMDEO KONDIBA BHOSALE

Digitally signed by DR. NAMDEO KONDIBA BHOSALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, cn=DR. NAMDEO KONDIBA BHOSALE
Date: 2021.10.12 15:38:24 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल, (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
४. सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर/औरंगाबाद
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. संबंधित अधिकारी.
७. निवडनस्ती (व्यशि-१).